सन २०१९-२० या आर्थिक वर्षात जाहिरात व प्रसिद्धी योजनेंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : हातमाग-२०१९/२८२/प्र.क्र.६६/टेक्स-३**
नवीन प्रशासन भवन, १४ वा मजला
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २१ जानेवारी, २०२०.

**वाचा :**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा. प्रशा-५ दिनांक १० मे, २०१६
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०१ एप्रिल, २०१९
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८ जुलै, २०१९
४) आयुक्त वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र शासन, नागपूर यांचे पत्र क्र. कार्या-५(२)/ब-३१७/८३२३/२०१९, दिनांक २६ नोव्हेंबर, २०१९
५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. हातमाग-२०१९/२८२/ प्र.क्र. ६६/टेक्स-३, दिनांक ५ डिसेंबर, २०१९.

**प्रस्तावना :-**

हातमाग उद्योगाच्या विकासाकरीता सूट व इतर अर्थसहाय्य (२८५१ ०११९), २६, जाहिरात व प्रसिध्दी या योजनेंतर्गत महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स) मुंबई यांना रु. ३८.६३ लाख इतकी रक्कम उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव आयुक्त वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र शासन, नागपूर यांनी दिनांक २६ नोव्हेंबर, २०१९ च्या पत्रान्वये शासनास सादर केला असून त्या अनुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

हातमाग उद्योगाच्या विकासाकरीता सूट व इतर अर्थसहाय्य (२८५१ ०११९), २६, जाहिरात व प्रसिध्दी या योजनेंतर्गत आयुक्त वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र शासन, नागपूर यांना सन २०१९-२० करीता रु. १५.०० लाख (रु. पंधरा लाख फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासनाची प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. सदरचा खर्च विहीत पद्धतीने करावा.

२. सदरचा रु. १५.०० लाख (रु. पंधरा लाख फक्त) इतका निधी महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स) मुंबई यांना त्यांच्यामार्फत आयोजित होणाऱ्या प्रदर्शनांकरीता,

इतर राज्यातील प्रदर्शनात भाग घेण्याकरीता तसेच प्रचार व प्रसिद्धी ह्यासाठी विहीत पद्धतीने खर्च करण्याच्या अधीन उपलब्ध करुन देण्यात यावा.

३. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८ जुलै, २०१९ अन्वये सन २०१९-२० च्या प्रथम नऊमाहीसाठी (डिसेंबर, २०१९ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतुदीच्या ६० टक्केच्या मर्यादेत खर्च करण्यास परवानगी देण्यात आली आहे. सन २०१९-२० या वर्षात "मागणी क्र. व्ही-२" अंतर्गत '२८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग खालील ११०,संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) विविध सहकारी संस्थांना अर्थसहाय्य, (०२)(५०) हातमाग उद्योगाच्या विकासाकरीता सूट व इतर अर्थसहाय्य (राज्य हिस्सा २५ टक्के) (कार्यक्रम) (२८५१ ०११९), २६, जाहिरात व प्रसिध्दी' या लेखाशीर्षाखाली रु. १५०.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित असून त्यापैकी ६०% म्हणजे रु. ९०.०० लाख इतका निधी डिसेंबर, २०१९ पर्यंत खर्च करण्यास उपलब्ध आहे. उपरोक्त लेखाशीर्षाखाली रु. ७५.०० लाख इतका निधी वाचा क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर यांना त्यांच्यामार्फत आयोजित होणा-या प्रदर्शनाकरीता उपलब्ध करुन देण्यात आला आहे. उर्वरित रु. १५.०० लाख इतका निधी महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स) मुंबई यांना वितरीत करण्यात येत आहे.

४. वित्त विभागाच्या उपरोक्त परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र. २ बाबत नमूद करण्यात येते की, योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्याने नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता नाही. तसेच परिशिष्टातील अ.क्र. ९ मधील तपासणी सूचीतील मुद्दयांचीही पूर्तता होत आहे.

५. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. संकीर्ण- २०१६/ प्र.क्र.३१/ कोषा.प्रशा-५, दिनांक १० मे, २०१६ मध्ये कोषागारात देयके पारित करताना घ्यावयाच्या दक्षतेबाबत सूचना देण्यात आल्या आहेत. सदर परिपत्रकातील परिच्छेद- अ) मधील बाबींची प्रस्तुत प्रकरणाशी संबंधित माहिती खालीलप्रमाणे आहे -

१) **विभागास प्रदान वित्तीय अधिकार** :- शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८ जुलै, २०१९ अन्वये अनुसार "२६, जाहिरात व प्रसिद्धी" या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले आहेत.

२) **मंजूर निधी** :- "मागणी क्र. व्ही-२" अंतर्गत '२८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग खालील ११०,संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) विविध सहकारी संस्थांना अर्थसहाय्य, (०२)(५०) हातमाग उद्योगाच्या विकासाकरीता सूट व इतर अर्थसहाय्य (राज्य हिस्सा २५

टक्के) (कार्यक्रम) (२८५१ ०११९), २६, जाहिरात व प्रसिध्दी' या लेखाशीर्षाखाली रु. १५०.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित असून त्यापैकी ६०% म्हणजे रु. ९०.०० लाख इतका निधी डिसेंबर, २०१९ पर्यंत खर्च करण्यास उपलब्ध आहे. त्यापैकी रु.७५.०० लाख इतका निधी वाचा क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळास उपलब्ध करुन देण्यात आला असून आता रु. १५.०० लाख निधी वितरणासाठी उपलब्ध आहे.

३) **मागील ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे** :- आयुक्त वस्त्रोद्योग, नागपूर यांच्यामार्फत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स) मुंबई यांना रु. १०.०० लाख इतका निधी वितरीत करण्यात आला होता. सदर रक्कम पूर्णपणे खर्च झाल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र हातमाग सहकारी महासंघाने सादर केले आहे.

४) **ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरित करण्यात येत आहे, त्या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही** :- उपरोक्त लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) **स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे** :- लागू नाही.

६) **वैयक्तिक लाभार्थींचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे** :- लागू नाही.

७) **बांधकामविषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिका-याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा** :- लागू नाही.

८) **खरेदी विषयक अद्ययावत प्रक्रिया उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या क्र. भांखस-२०१४/ प्र.क्र.८२/ भाग III / उद्योग-४, दि. १.१२.२०१६ च्या शासन आदेशानुसार करावी.**

९) **साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी.**

६. सदर निधी आवश्यकतेनुसार महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स) मुंबई यांना थेट ECS द्वारे अदा करण्यात यावा.

७. शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपद्धतीची सुधारीत नियमपुस्तिका उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या क्र. भांखस-२०१४/ प्र.क्र.८२/ भाग III / उद्योग-४, दि. १.१२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रसिद्ध केली आहे. सदर शासन निर्णयाच्या तसेच त्यासोबतच्या नियमपुस्तिकेतील तरतुदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

८. जाहिरातीवरील खर्च करताना त्यासंबंधीचे वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेत नमूद वित्तीय अधिकारांचे पालन करण्यात यावे. तसेच जाहिराती संदर्भात शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. मावज-२०१५/प्र.क्र.३२७/३४, दिनांक ६ ऑक्टोबर, २०१५ मध्ये तसेच या संदर्भातील सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ३० मार्च, २०१६ व दिनांक ५ जानेवारी, २०१७ च्या व इतर संबधित शासन निर्णयात नमूद सूचनांनुसार कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी तथा त्यांचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

९. प्रमाणित करण्यात येते की, जाहिरात व प्रसिद्धी योजेंतर्गत यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक/महालेखापाल यांच्याकडून कोणतेही गंभीर आक्षेप नाहीत.

१०. ह्या निधीतून खरेदी करण्यात येणाऱ्या साहित्याची देयके प्रत्यक्ष वस्तू प्राप्त झाल्यानंतरच संबंधितांना ECS द्वारे अदा होतील याची दक्षता घ्यावी.

११. प्रमाणित करण्यात येते की, सदर निधी स्वीय प्रपंची लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता खर्च केला जाणार आहे.

१२. उपरोक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च "मागणी क्र. व्ही-२" अंतर्गत '२८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग खालील ११०,संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) विविध सहकारी संस्थांना अर्थसहाय्य, (०२)(५०) हातमाग उद्योगाच्या विकासाकरीता सूट व इतर अर्थसहाय्य (राज्य हिस्सा २५ टक्के) (कार्यक्रम) (२८५१ ०११९), २६, जाहिरात व प्रसिध्दी' या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

१३. सदर रक्कम जिल्हा कोषागार, नागपूर येथून काढण्यासाठी आयुक्त वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर यांचे कार्यालयातील सहाय्यक संचालक (लेखा) यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व आयुक्त वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रक्कम ज्या प्रयोजनासाठी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावी.

१४. महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स) मुंबई यांनी उपरोक्त रकमेचे विनियोग प्रमाणपत्र आयुक्त वस्त्रोद्योग, नागपूर यांच्यामार्फत शासनास सादर करावे.

१५. वरील रकमेचा खर्च विहीत पद्धतीने करण्यात यावा.

१६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८ जुलै, २०१९ अन्वये "२६, जाहिरात आणि प्रसिध्दी" या प्रयोजनासाठी प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारान्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१२११५२८४७६५०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Gauri Rahul Mhaske

Digitally signed by Gauri Rahul Mhaske
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co Operation Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e3b06f24c3c5bb026c414c42f865f39144c21fb0f8c3a69c8e6e8dc2c5bb9ddd, serialNumber=b018ba858dd6b20cc7a84f6bc86a86d6a6e9ac3ac56c5dbfcd89f36c74de3e1f, cn=Gauri Rahul Mhaske
Date: 2020.01.21 15:30:40 +05'30'

**( गौरी म्हस्के )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १, मुंबई / महाराष्ट्र - २, नागपूर
२) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र - १, मुंबई / महाराष्ट्र - २, नागपूर
३) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५) कोषागार अधिकारी, नागपूर
६) आयुक्त वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र शासन, नागपूर
७) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स), मुंबई.
८) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
९) कार्यासन १६-स / १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) कार्यासन अधिकारी, रोख शाखा, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवड नस्ती, टेक्स-३ कार्यासन